महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या ,नागपूर यांस भाग भांडवली अंशदान वितरीत करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांकः हातमाग २०१५/प्र.क्र.२२/टेक्स-३
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
तारीख: ४ नोव्हेंबर, २०१५.

वाचा -

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, नागपूर यांचा प्रस्ताव दिनांक ४.२.२०१५ व दिनांक १०.८.२०१५.
२) शासन निर्णय क्रमांकः हातमाग २०१५/प्र.क्र.२२/टेक्स-३, दिनांक ३१.३.२०१५
३) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक ३०.६.२०१
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१५/प्र.क्र.३४/कोषा-प्रशा५, दिनांक २४.७.२०१५

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाची स्थापना कंपनी कायदा १९५६ अंतर्गत, हातमाग विणकरांना विणकाम करण्यासाठी आवश्यक असलेले अर्थसहाय्य उपलब्ध करुन रोजगार मिळवून देणे या सामाजिक उद्देश्याकरीता, तिडके समितीच्या शिफारशीनुसार दिनांक २९.१०.१९७१ रोजी करण्यात आली आहे. हातमागाशी संबंधित बाबींचा अभ्यास करणे व हातमाग उद्योगासाठी सल्लागाराचे काम हे महामंडळ करते. महामंडळाचे अधिकृत भागभांडवल (Authorised Share Capital) रु. ३५००.०० लक्ष असून भरणा केलेले भागभांडवल (Paid up Capital) रु. ३३३०.२५ लक्ष इतके आहे. सन २०१५-१६ मध्ये रु. ७०.०० लक्ष इतके भागभांडवल वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय-

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, नागपूर यांना रु. ७०.०० लक्ष ( रु. सत्तर लक्ष ) भाग भांडवली अंशदान वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर " (MAHARASHTRA STATE HANDLOOMS CORPORATION LTD., NAGPUR) यांना RTGS द्वारे वितरीत करण्यात यावी. बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

State Bank of India, Ravi Nagar Branch, Nagpur

Current Account No. ३००१९८०५४४६

IFSC Code - SBIN००१२९५७

MICR Code- ४४०००२०४४.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन हातमाग महामंडळाला वितरीत करण्यासाठी श्रीमती अ.म.जोशी, कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि श्री. रा.स.अटक, उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. मागणी क्रमांक व्ही-३, ४८५१ ग्रामोद्योग व लघुउद्योग यावरील भांडवली खर्च, (००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (००)(०२) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान ३२ अंशदाने (४८५१ ००७९).

५. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान" या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करीता रु. १००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे.

६. सदर आदेश वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत. सदर परिपत्रकातील क्र.१ते८ बाबी या योजनेस लागू होत नाहीत. या योजनेस प्रशासकीय मान्यता असून ३२ अंशदाने या बाबीखालील खर्च करण्यासाठी आवश्यक बाब क्र. ९ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

७. सदर योजना ही नियमित योजनांतर्गत योजना असल्याने व अंशदाने याखाली अर्थसहाय्य वितरण असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. वित्त विभाग परिपत्रक क्र. संकीर्ण २०१५/ प्र.क्र.३४/कोषा-प्रशा५, दिनांक २४.७.२०१५ मधील सर्व अटींची पूर्तता होत आहे.

८. या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

९. या योजनेच्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

१०. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाने खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा आदेश निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत.

११. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाने खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा.

१२. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाने साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी.

१३. श्रीमती अ.म.जोशी, कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी उपरोक्त रक्कम आहरीत करुन महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांना तातडीने RTGS द्वारे वितरीत करावी.

१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांनी उपरोक्त रकमेच्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर मार्फत शासनास सादर करावे. सदर रक्कम ज्या उद्देश्यासाठी अदा करण्यात येत आहे, त्याच उद्देश्यासाठी वापरण्यात यावी.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०५१२४६४१९४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anand Arjun Mali

Digitally signed by Anand Arjun Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Arjun Mali
Date: 2015.11.05 12:56:50 +05'30'

(आ.अ.माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर
४. अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग विकास महामंडळ मर्या. नागपूर
६. उप सचिव (वस्त्रोद्योग) टेक्स-३, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
७. कार्यासन अधिकारी, १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-२, अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती टेक्स-३.

.